मंत्रालय इमारत व नवीन प्रशासन इमारत या इमारती मधील छन्नमार्गामधून प्राप्त झालेले टाकावू फर्निचर व इतर वस्तुंची विक्री करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग,
शासन निर्णय क्रमांक-एफआरटी-२००७/प्र. क्र.४६४/प्रशासन-४
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांकः- १४ जानेवारी २००८

वाचा :-१) शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग , क्र. शाकाजा-१०.००/प्र. क्र. ४५/२०००/२२, दिनांक १३/९/२००१.
२) शासन निर्णय सा. बां. वि. क्र. एफआरटी-२००६/प्र. क्र. १४५/प्रशासन-४, दिनांक-३/४/२००६.

प्रस्तावना.

मंत्रालय इमारत व नवीन प्रशासन इमारत या इमारती मधील छन्न मार्गात प्राप्त झालेले टाकावू फर्निचर व इतर वस्तु सार्वजनिक बांधकाम विभागाकडून ताब्यात घेण्यात येतात. त्या वस्तुंचा साठा मंत्रालय विस्तार इमारतीच्या पाठीमागील बाजूस करण्यात येतो. सामान्य प्रशासन विभागाकडुन निर्गमित दिनांक १३/९/२००१ च्या परिपत्रकातील सुचनांनुसार उचलण्यात आलेले फर्निचर व वस्तूंचे शुन्य मुल्यांकन गृहीत धरुन त्याची विल्हेवाट लावण्यासाठी सा. बां. विभागास पूर्ण अधिकार देण्यात आलेले आहेत. सदर फर्निचर व साहित्य विकण्यासाठी दिनांक-३/४/२००६ चे शासन निर्णयान्वये विभागीय समिती गठीत करण्यात आली होती . सदरहू समितीच्या बैठकांना उपस्थित रहाण्यासाठी अवर सचिव ( सा.प्र. वि.-२१ ) , सा. प्र. वि. यांना विशेष आमंत्रित सदस्य म्हणुन नेमण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार विभागीय समितीचे पुढीलप्रमाणे पुनर्गठण करुन सुधारीत समिती स्थापन करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

शासन निर्णय-

संदर्भाधीन शासन निर्णय सा. बां. वि. क्र. एफआरटी-२००६/प्र. क्र. १४५/प्रशासन-४, दिनांक-३/४/२००६ रद्य करण्यात येत आहे. शासन आता असा निर्णय घेत आहे की, मंत्रालय इमारत व नवीन प्रशासन इमारत या इमारती मधील छन्न मार्गात प्राप्त झालेले टाकावू फर्निचर

व इतर वस्तुंची विक्री करण्यासाठी ठेकेदारांकडून मोहरबंद निविदा / दरपत्रके मागवून ठेकेदाराची नियुक्ती करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | उप सचिव (आस्थापना), सार्वजनिक बांधकाम विभाग. | अध्यक्ष |
| २. | विशेष अधिकारी (लेखापरीक्षा) सार्वजनिक बांधकाम विभाग. | सदस्य |
| ३. | कार्यकारी अभियंता (इलाखा शहर विभाग) सार्वजनिक बांधकाम विभाग. | सदस्य |
| ४. | अवर सचिव (आस्था-२१) सामान्य प्रशासन विभाग. | विशेष आमंत्रित सदस्य |
| ५. | कार्यासन अधिकारी प्रशासन-४, सार्वजनिक बांधकाम विभाग. | सदस्य सचिव |

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

201007121524020001

(प्र. गं. घोक्षे)
कार्यासन अधिकारी.

प्रत :-
प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई .
उप सचिव (आस्थापना), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
आंतर वित्तिय सल्लागार व उप सचिव , सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
विशेष अधिकारी (लेखापरीक्षा), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव (आस्था-२१), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
मुख्य अभियंता, सा. बां. , प्रादेशिक विभाग, मुंबई.
अधिक्षक अभियंता , मुंबई.
कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई
कार्यासन अधिकारी (प्रशासन-४), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती (प्रशासन-४), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.